क्र. एसजेजे –०१९६/५[९१]तीआरएस–२
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई–४०० ०३२.
दिनांक– ४ ऑगस्ट १९९७

विषय :– मे. तिराप वनिर अँन्ड सॉ. मिल्स लि. १०८ जॉली मेकर चेंबर ११ नरीमन पाईन्ट मुंबई यांनी पुरवठा केलेल्या प्लायवूड ३ व ४ एमएमचा पुरवठा कालावधी वाढवून देणेबाबत...

ज्ञापन:– महालेखापाल [१] मुंबई, [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र राज्य मुंबई यांना असे कळविण्यात येते की, मे. तिराप वनिर अँन्ड सॉ. मिल्स लि. १०८ जॉली चेंबर ११ नरीमन पॉइन्ट, मुंबई यांनी प्लायवूड ३ व ४ एम. एम. चा पुरवठा कराराप्रमाणे कारागृह महानिरीक्षणालय, पुणे या कार्यालयास दिनांक १७. ४. ९५ पर्यंत करणे आवश्यक होते. पण सदरचा पुरवठा त्यांनी दिनांक २१. १०. ९५ रोजी उशिराने केला. पुरवठा उशिराने करण्याचे कारण म्हणजे आसाम राज्यात नद्यांना पूर येऊन वाहतुकी योग्य रस्ते नव्हते. या आधारावर विभागीय भांडार समितीने सदरच्या फक्त २१ दिवसाचा विलंब माफ केला. पण त्यापुढील विलंब शासन मान्यतेने माफ करावा म्हणून कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास प्रस्ताव सादर केला. उशिरा पुरवठा केल्यामुळे कारागृह विभागाचे नुकसान झालेले नाही, तसेच मध्यतरीच्या काळात बाजार भावात घट झालेली नव्हती हे कारण लक्षात घेऊन विभागातील मध्यवर्ती ~~खरेद~~ भांडारात खरेदी समितीने पुढील विलंब माफ करण्याची शिफारस शासनास केली. त्या आधारे पुरवठा करण्यास झालेली १६७ दिवसाचा [दि. ८. ५. ९५ ते २१. १०. ९५ या कालावधीचा] विलंब याद्वारे माफ करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

[ सी. बी. चौधरी ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृहविभाग.

प्रति,

महालेखापाल–१ [लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र राज्य, मुंबई.

क्रमांक- एमअेजे-०१९६/५[९१] पीआरएस-२.

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक- ७ ऑगस्ट १९९७

प्रति,

माहिती व योग्य त्या कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२] कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

३] महालेखापाल [१] महाराष्ट्र राज्य, मुंबई

[ सी. पी. चौधरी ]

अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.